**गोदावरी पाणी तंटा लवादामध्ये प्राणहीता उपखोऱ्यात मध्यप्रदेश क्षेत्रातील एक वा अधिक साठा जलशयांमधून महाराष्ट्र राज्यास दि. १५ ऑक्टो. ते ३० जून या काळात ७५ टक्के विश्वासार्हतेने १५ अघफू पाणी मध्यप्रदेश राज्याने द्यावयाचे असून याकरिता आवश्यक बांधकामाचा पूनर्वसन व भूसंपादन यासह खर्च महाराष्ट्र करेल अशी तरतुद असून त्या अनुषंगाने मध्यप्रदेशातील सोननदी प्रकल्प ता. लांजा जि.बालाघाट मध्यप्रदेश या प्रकल्पाचा सविस्तर सर्वेक्षणाच्या अंदाज प्रत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्र. सोननदी २०१०/१३४५/(२४४/१०)/जसंअ,**
**मंत्रालय,मुंबई ४०० ०३२,**
**दिनांक :- १२/१०/२०१०**

**पहावे:-१) कार्यकारी संचालक विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्र ३६२६/विपाविम/कातां ५/(धा. क्र. ७८)/२०१०, दिनांक ०९.०६.२०१०.**

**प्रस्तावना:-**

गोदावरी पाणी तंटा लवादामध्ये प्राणहिता उपखोऱ्यात मध्यप्रदेश क्षेत्रातील एक वा अधिक साठा जलाशयांमधून महाराष्ट्रास दि.१५ ऑक्टोबर ते दि.३० जून या काळात ७५ टक्के विश्वासार्हतेने १५ अघफू पाणी सोडण्याची तरतूद केली जाईल अशी नोंद असून याकरिता आवश्यक बांधकामांचा, पुनर्वसन व भूसंपादन यासह खर्च महाराष्ट्र करेल अशीही तरतूद आहे. या पाण्याचा वापर करण्यासाठी महाराष्ट्र क्षेत्रात पुरेशा क्षमतेचे विअर बांधण्यात येईल, अशी तरतूद आहे.

सदर तरतुदीच्या अनुषंगाने धापेवाडा उपसा सिंचन योजनेचे (बॅरेजसह) नियोजन करण्यात आलेले आहे. त्यामधील टप्पा-३ मध्ये मध्य प्रदेशातील प्रस्तावित साठा स्थळातून मिळणा-या १५ अघफू पाण्याचा वापर करुन ४६००० हेक्टर क्षेत्रास सिंचन करण्याचे प्रस्तावित आहे.

लवादातील तरतुदीस अनुसरुन २५ ऑगस्ट, २००० रोजी मुंबई येथे झालेल्या २७व्या आतंरराज्यीय नियंत्रण मंडळाच्या बैठकीत मध्यप्रदेशाने असे मान्य केले की, गोदावरी लवादातील तरतुदीनुसार पाणी देण्यासाठी सोन व देव प्रकल्पांचे प्रकल्प अहवाल तयार करण्यात येतील व त्यानुसार लवादातील तरतुदीनुसार महाराष्ट्र आवश्यक तो खर्च देईल.

दि.१७ एप्रिल, २००७ रोजी मुंबई येथे झालेल्या सचिव स्तरीय बैठकीत असे ठरले की, मध्य प्रदेशाने सोन व देव प्रकल्पांच्या सर्वेक्षणाची अंदाजपत्रके शीघ्रतेने तयार करावीत व पावसाळयानंतर

सर्वेक्षणाचे काम हाती घ्यावे. या सर्वेक्षणाचा व सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याचा खर्च महाराष्ट्र शासन देईल.

गोदावरी लवादातील तरतुदीनुसार त्यासाठी येणारा खर्च महाराष्ट्र शासनाकडून देण्यात येणार आहे. तसेच सदर प्रकल्पामुळे महाराष्ट्र राज्यातील कोणताही भूभाग पाण्याखाली येत नाही. मध्य प्रदेश राज्याकडून मिळणा-या एकूण १५ अघफू पाण्यापैकी सोन नदी प्रकल्पामधून महाराष्ट्र राज्याला ९ अघफू पाणी देण्याचे नियोजन आहे. त्यानुसार धापेवाडा उपसा सिंचन योजनेचे (बॅरेजसह) नियोजन करण्यात आलेले आहे. त्यामधील टप्पा-३ मध्ये मध्य प्रदेशातील प्रस्तावित साठा स्थळातून मिळणा-या १५ अघफू पाण्याचा वापर करुन ४६००० हेक्टर क्षेत्रास सिंचन करण्याचे प्रस्तावित आहे.

**<u>शासन निर्णयः-</u>**

**मध्यप्रदेशातील सोननदी प्रकल्पा ता. लांजी, जि.बालाघाट, मध्यप्रदेश या योजनेच्या सविस्तर सर्वेक्षणाच्या रु.४८,९८,०००/- लक्ष (रु.अठठेचाळीस लक्ष अठठयाणव हजार फक्त) किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

**या प्रकल्पावर हाणारा खर्च २७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील (डी) पाटबंधारे व पुरनियंत्रण ००५ सर्वेक्षण व अन्वेषण ००१ संचालन व प्रशासन नियोजन व्यतिरिक्त या लेखा शिर्षाखाली टाकावा. या कामासाठी आर्थिक तरतूद असल्या खेरीज कोणताही खर्च करु नये.**

**सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०१०१०१२१८२५१४००१ असा आहे.**

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

**(प्र.ना.घोडके)**
**शासनाचे उप सचिव**

प्रतः-

मा.मंत्री जलसंपदा(कृखोपाम वगळून) यांचे खाजगी सचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई
मा. राज्यमंत्री जलसंपदा, खाजगी सचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, (जलसंपदा विभाग), मंत्रालय, मुबई यांचे स्वीय सहायक.
कार्यकारी संचालक विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर.
अधीक्षक अभियंता, पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण मंडळ, नागपूर.
आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुबई
कार्यासन जसंअ संग्रहार्थ